**पुणे वनवृत्तातील मौजे वारजे येथील स. नं १२० या ठिकाणी संरक्षित भिंत बांधणे या कामास प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**महसुल व वन विभाग**
**शासन निर्णय क्र.संकीर्ण -२०१७/प्र.क्र.३५/फ-५**
मंत्रालय,मुंबई - ४०० ०३२.
दिनांक - २० मार्च २०१७

वाचा - १. अप्पर प्रधान मुख्य वन संरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास),महाराष्ट्र राज्य,नागपुर यांचे पत्र क्र.) कक्ष -२४(३)/व अ/१०९९/२०१६-१७, दि.१६/२/२०१७

प्रस्तावना -

अपर प्रधान मुख्य वन संरक्षक (अर्थसंकल्प,नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य नागपुर यांनी दि.१६/२/२०१७ च्या पत्रान्वये पुणे वनवृत्तातील मौजे वारजे येथील स. नं १२० या ठिकाणी संरक्षित भिंत बांधणे या कामाच्या रु.४९,३६,५१३/- रकमेच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबतचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे.

सदरहू बांधकामाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

पुणे वनवृत्तातील मौजे वारजे येथील स. नं १२० या ठिकाणी संरक्षित भिंत बांधणे या कामास सार्वजनिक बांधकाम विभागाने दिलेल्या मंजूरीनुसार खालील विवरणपत्रात नमुद केल्याप्रमाणे एकुण रु. ४९.४४ लक्ष इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | कामाचा तपशिल | शासनमान्य अंदाजपत्रकीय रक्कम |
|---|---|---|
| १ | Construction of R.C.C. Compound Wall with Barbed Wire Fencing around Forest Survey No. 120 at Warje in Bhamburda Range of Pune Division (Length 480.00 Meter | रु.४९.४४ लक्ष |

सदरहू प्रशासकीय मान्यता (वित्तीय मान्यता वगळून) पुढील अटींच्या अधीन राहून प्रदान करण्यात येत आहे.

१) काम करण्यापुर्वी संरक्षक भिंतीचे संकल्पन सक्षम अधिका-याकडून मंजूर करुन घेण्यात यावे.
२) काम सुरु करण्यापूर्वी सदर अंदाजपत्रके संबंधीत अधीक्षक अभियंता व मुख्य अभियंता यांच्याकडून साक्षांकीत करुन घ्यावे.
३) काम सुरु करण्यापूर्वी मांडणी नकाशा तसेच विस्तृत नकाशास वास्तूविशारदांकडून मंजूरी घेऊनच काम सुरु करावे.

४) कामासाठी वनसंवर्धन अधिनियम १९८० अंतर्गत आवश्यक असलेली परवानगी घ्यावी.
५) काम सुरु करण्यापूर्वी जागेच्या मालकी हक्काबाबतची पूर्तता करून घ्यावी.
६) ढोबळ स्वरुपात धरण्यात आलेल्या तरतूदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक दरपत्रके मंजूर करुनच काम हाती घ्यावे.
७) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र. इएनव्ही-२०१३/प्र.क्र. १७७/तां.क.१ दि. १० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.

हे आदेश शासन निर्णय वित्त विभाग, क्र. विअप्र १०.०८/प्र.क्र. ७०/२००८/ विनियम, दि. १५ मे २००९ , वित्तीय अधिनियम पुस्तिका, १९७८, भाग पहिला, उप विभाग- पाच नुसार महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिका अंतर्गत प्रदान करण्यात आलेले वित्तीय अधिकार, अ.क्र.१, परिच्छेद क्र. १३४ नुसार विभागास असलेल्या वित्तीय अधिकारानुसार व सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक १५३/२०१७/इमा-३ दि. ७/३/२०१७ ला अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०३२०१५११०६७४१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Anil N. Dhas

Digitally signed by Anil N. Dhas
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Dept, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=699d21cc89897191099434d443603426329c81b1b292ed2d168c892811118cc7, cn=Anil N. Dhas
Date: 2017.03.20 15:11:56 +05'30'

**(अनिल धस)**
कार्यासन अधिकारी
महसूल व वन विभाग

**प्रति,**

१. प्रधान मुख्य वन संरक्षक (वन बल प्रमुख) महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. अपर प्रधान मुख्य वन संरक्षक ( अर्थसंकल्प नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य,नागपुर
३. मुख्य वन संरक्षक (प्रादेशिक) पुणे.
४. उप वन संरक्षक, पुणे वन विभाग, पुणे
५. महालेखापाल,१/२ (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखा परिक्षण) मुंबई / नागपुर
६. सार्वजनिक बांधकाम विभाग (इमारत-३), मंत्रालय, मुंबई-३२.
७. कक्ष अधिकारी (व्यय-१०)(विनियम) वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई-३२.
८. नियोजन विभाग (का-१४७५), मंत्रालय,मुंबई-३२.
९. ब-१/फ-१/फ-२ कार्यासन ,महसुल व वन विभाग,मंत्रालय,मुंबई-३२.
१०.कार्यासन फ-५, महसूल व वन विभाग, मंत्रालय,मुंबई-३२ (निवड नस्ती)